**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे अंतर्गत अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.७०/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०२ मार्च, २०२३.

**संदर्भ :** १) महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.४५, दि.०८ सप्टेंबर, २०२२.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -११२२/ प्र.क्र.१२८/१६-ब, दि.२१ सप्टेंबर, २०२२ व दि.३१ जानेवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या, शासकीय विभागांच्या आणि त्यांच्या दुय्यम कार्यालयांच्या किंवा प्राधिकरणाच्या नागरी सेवा व पदे यांच्या संवर्गात अधिसंख्य पदे निर्माण करणे व त्यावर निवड प्राधिकरणांनी निवड व शिफारस केलेल्या उमेदवारांना नियुक्ती देण्यासंदर्भात महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.४५, दि.०८ सप्टेंबर, २०२२, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ सप्टेंबर, २०२२ व दि.३१ जानेवारी, २०२३ अन्वये तरतुद करण्यात आली आहे. याअनुषंगाने मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे यांच्या कार्यालयात पात्र उमेदवारास वाहन चालक पदावर नियुक्ती देण्यासाठी वाहन चालकाचे ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे यांच्या आस्थापनेवर श्री.दिपक नागेश गुंड यांच्याकरीता वाहन चालकाचे ०१ अधिसंख्य पद निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. श्री.दिपक नागेश गुंड यांच्या नियुक्तीसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१ सप्टेंबर, २०२२ मधील परिच्छेद क्र.०२ ते ०६ मधील सूचना विचारात घेऊन अधीक्षक अभियंता, सार्वजनिक

बांधकाम मंडळ, पुणे यांनी सदरहू कर्मचाऱ्याच्या पदाचा विवक्षित कालावधी नमूद करुन नियुक्ती आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करावेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, सन २०२२ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.४५, दि.०८ सप्टेंबर, २०२२ ला अनुलक्षून सामान्य प्रशासन विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, दि.२१ सप्टेंबर, २०२२ व दि.३१ जानेवारी, २०२३ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०२१७४६०८१७१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKRAM NIVRUTTI DHAMAL

Digitally signed by VIKRAM NIVRUTTI DHAMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=10D36944A4B86EAB516B1B70183709C5FB570CFDF5A52755ADFEF51ED380B836, cn=VIKRAM NIVRUTTI DHAMAL
Date: 2023.03.02 17:50:27 +05'30'

**( विक्रम नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, पुणे.

**प्रत :-** १) मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) /सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) कार्यासन सेवा-३ / सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती.